GR-2004|008|13|22002-|20]

**खाजगी मालगुजारी तलावांची रोहयो अंतर्गत नुतनीकरण / विशेष दुरुस्ती करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.लपायो १०९८/प्र.क्र.३८/जल १,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ६ डिसेंबर, २०००.

**पुर्वपिठीका** :-

इंग्रजांच्या राजवटीत मालगुजारी अस्तित्वात आली व या तलावांची मालकी मालगुजारांकडे आली. त्यानंतर १९५० च्या मानवी हक्क संपादन कायद्यान्वये ज्या तलावांपासून शेतक-यांच्या समूहास सिंचन होत होते व ज्या तलावांवर पाणी वापराबाबत निस्तार हक्क होते असे सर्व तलाव शासनाने ताब्यात घेतले. त्यालाच **माजी मालगुजारी तलाव** असे समजण्यात येते.

पूर्व विदर्भातील भंडारा, गोंदिया, चंद्रपूर, गडचिरोली व नागपूर या जिल्ह्यातील व मराठवाड्यातील शेतक-यांनी स्वतःचा पैसा व श्रम वापरुन सुमारे ३०० वर्षापूर्वी तलाव बांधले आहेत. त्या काळातील मालगुजारांनी खाजगी उपक्रमाने अशा तलावांची शृंखला निर्माण केली व याची मालकी मालगुजारांकडे होती. ज्या तलावांपासून मालगुजार स्वतःच्या शेतीला सिंचन करीत होते व त्यांचे हक्क अबाधित राहीले असे तलाव **खाजगी मालगुजारी तलाव** असे संबोधावे लागेल.

कालांतराने मालगुजारी संपुष्टात आली असल्याने व खाजगी मालगुजारी तलावांचे पाणी फक्त मालगुजार स्वतः वापरत नसून लाभार्थ्यांचा समूह या पाण्यावर सिंचन करीत आहे असे निदर्शनास आले आहे. काही खाजगी मालगुजारी तलावांवर लाभार्थ्यांच्या समूहास निस्तार हक्क प्राप्त आहेत, तर काही खाजगी मालगुजारी तलावांवर निस्तार हक्क नाहीत. परंतू तलावाची मालकी असलेला लाभधारक व इतर लाभधारकांचा समूह परस्पर सामंजस्याने पाण्याचा वापर करतात. त्यामुळे हे तलाव जरी खाजगी मालगुजारी तलाव या संकल्पनेत मोडत असले तरी वर नमूद केल्याप्रमाणे लोकोपयोगी आहे. या तलावांमुळे पिकास संरक्षित पाण्याची पाळी मिळून उत्पादनात निश्चित वाढ अपेक्षित आहे. तसेच सिंचना व्यतिरिक्त मत्स्य व्यवसाय, शिंगाड्याचे उत्पादन, कमळांचे फुलांचे उत्पादन, जनावरांना पिण्याचे पाणी इ. उपयोगासाठी या तलावाचा फायदा होऊ शकेल. या खाजगी तलावांचे पुर्नस्थापन करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याबाबत शासन आता पुढीलप्रमाणे आदेश देत आहे.

**शासन निर्णय** :-

रोजगार हमी योजनेच्या निकषानुसार ५१:४९ या प्रमाणात ज्या ... बसत असतील अशा खाजगी मालगुजारी तलावांची दुरुस्ती **रोजगार हमी योजनेंतर्गत** खालील अटींच्या अधीन राहून करण्यात यावी.

१. खाजगी मालगुजारी तलावांच्या विशेष दुरुस्ती अंतर्गत तलावाच्या पाळीची दुरुस्ती, विमोचकाची व सांडव्याची दुरुस्ती आवश्यकतेनुसार नवीन प्लग टाईप विमोचक बांधणे, तलावाच्या पाळीची उंची वाढविणे इ. बाबींचा समावेश राहील.

२) ० ते १०० हे. सिंचन क्षमतेच्या खाजगी मालगुजारी तलावांच्या दुरुस्तीच्या प्रस्तावास जिल्हा परिषद प्रशासकीय मान्यता देईल.

३) या तलावांच्या विशेष दुरुस्तीच्या अंदाजपत्रकास तांत्रिक मंजूरीचे संपूर्ण अधिकार अधिक्षक अभियंता, लघु पाटबंधारे (स्था.स्तर) मंडळाकडे राहील.

**प्रशासकीय बाबी** :-

**अ)** जोपर्यन्त खाजगी मालक असे मालगुजारी तलाव शासनास विनामूल्य हस्तांतरित करीत नाहीत तोपर्यन्त अशा खाजगी मालगुजारी तलावांची दुरुस्ती शासकीय निधीतून करता येणार नाही. खाजगी मालकांनी असे मालगुजारी तलाव शासनास विनामूल्य हस्तांतरित केल्यानंतर त्याबाबतची नोंद महसूल पत्रकात घेण्यात यावी. तसेच खाजगी मालगुजारी तलावाचे नूतनीकरण / विशेष दुरुस्ती शासन खर्चाने एकदाच करण्यात येईल. तद्नंतर पुढील देखभाल करण्याची जबाबदारी लाभधारकांची राहील.

**ब)** खाजगी मालगुजारी तलावांचे मालक हे सदरहू तलाव शासनाच्या ताब्यात देवून या तलावाचे पाणी इतर लाभार्थ्यांना देण्याबाबतचा हक्क स्वीकारतील व त्यांची नोंद महसुल पत्रक ७/१२ वर करुन देण्यास तयार आहेत असे हमीपत्र देतील. अशा मालगुजारी तलावांची दुरुस्ती शासन खर्चाने करता येईल.

**क)** खाजगी मालगुजारी तलावाचे पाण्यावर ज्या लाभधारकांचा निस्तार हक्क प्राप्त असेल किंवा जे लाभधारक खाजगी तलावाच्या पाण्याचा सिंचनाकरीता वापर करीत असतील त्या लाभधारकांनी व ज्यांचे नांवे तो तलाव असेल त्या मालकाने लेखी मागणी केल्यानंतर व शहानिशा केल्यावरच त्या खाजगी तलावाची दुरुस्ती करण्यात येईल.

**ड)** ज्या तलावावर निस्तार हक्क नाहीत अशा तलावांबाबत तलावांची मालकी असलेल्या लाभधारकाने पाण्याच्या नियोजनप्रमाणे अतिरिक्त पाणी इतर लाभार्थ्यांच्या समूहास देण्याचे हमीपत्र आवश्यक राहील. तसेच इतर लाभार्थी शेतकऱ्यांनी शासनाच्या प्रचलित दराप्रमाणे पाणीपट्टी देण्यासंबंधी हमीपत्र देणे आवश्यक राहील.

**तांत्रिक बाबी** :-

१) खाजगी मालगुजारी तलावाच्या क्षेत्रातील प्रचलित पीक पध्दतीनुसार पाण्याची गरज, पाण्याचा येवा व तलावाचा वापर याप्रमाणे प्रकल्पाचे नियोजन करण्यात यावे.

२) खाजगी मालगुजारी तलावापासून सद्यःस्थितीत होणारे प्रत्यक्ष सिंचन व तलावाच्या नुतनीकरण/दुरुस्ती नंतर (पुर्नस्थापित होणारे सिंचनक्षेत्र) होणारी वाढ प्रकल्प अहवालामध्ये दर्शविण्यात यावी तसेच तलावाची मूळची साठवण क्षमता किती कमी झाली व नुतनीकरणानंतर साठवण क्षमता किती प्रस्थापित होणार हे सविस्तर सर्वेक्षण करुन प्रकल्प अहवालात नमूद करावे.

३) खाजगी मालगुजारी तलावांची विशेष दुरुस्ती/नुतनीकरण करतांना भूसंपादनाची आवश्यकता असल्यास सदर जमीन शेतकऱ्याने विनामूल्य लेखी स्वरुपात (दानपत्र) उपलब्ध करुन द्यावी.

४) एका गावात जर एकापेक्षा जास्त खाजगी मालगुजारी तलाव असतील व त्या तलावातील पाण्याचा येवा एकमेकांशी संलग्नित असेल तर या सर्व तलावांना एक पाणलोट क्षेत्र समजून दुरुस्तीचा प्रस्ताव तयार करण्यात यावा.

हे आदेश नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. निरंक/प्रसनि दि. २७.१०.२००० व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ६८२७ दि. १४.११.२००० अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

८-१२-२०००

( बी.एम.केंद्रेकर )

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.